**कामाच्या ठिकाणी महिला कर्मचाऱ्यांच्या होणाऱ्या लैंगिक छळवणूकीसंबंधीच्या तक्रारींचे निवारण करण्यासाठी कार्यालयात अंतर्गत तक्रार निवारण समितीची स्थापना करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**उद्योग ,ऊर्जा व कामगार विभाग,**
**शासन निर्णय क्रमांक : आयएलई-२०२३/प्र.क्र.२०४/प्रशासन-३**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक : ०४ जुलै, २०२३.

वाचा : १) केंद्र शासनाचा कामाच्या ठिकाणी महिलांचे लैंगिक छळापासून संरक्षण (प्रतिबंध, मनाई आणि निवारण) अधिनियम २०१३, दिनांक २२.०४.२०१३ व नियम दि. ०९.१२.२०१३.
२) महिला व बाल विकास विभाग, शासन परिपत्रक क्र: मकचौ २०१३/प्र.क्र. ६३/मकक, दिनांक १९.०६.२०१४.
३) उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग कार्यालयीन आदेश: तनिस-२०१९/प्र.क्र.०१/प्रशा-३, दि.२५.०२.२०१९
४) महिला व बाल विकास विभाग, शासन परिपत्रक क्र: मकचौ २०१४/प्र.क्र. ६३/मकक, दिनांक १९.०६.२०२३.

प्रस्तावना: विभागाच्या दि.२५.०२.२०१९ रोजीच्या कार्यालयीन आदेशान्वये केंद्र शासनाच्या कामाच्या ठिकाणी स्त्रियांना काम करण्यास पोषक आणि लैंगिक छाळापासून मुक्त वातावरण मिळावे या हेतूने कामाच्या ठिकाणी महिलांचे लैंगिक छळापासून संरक्षण (प्रतिबंध, मनाई आणि निवारण) अधिनियम-२०१३ दिनांक २२.०४.२०१३ व नियम ०९.१२.२०१३ तसेच महिला व बाल विकास विभाग, शासन निर्णय क्र. मकचौ २०१३/प्र.क्र. ६३/मकक, दिनांक १९.०६.२०१४ ला अनुसरुन उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग (खुद्द) च्या आस्थापनेवर कार्यरत असणाऱ्या महिला कर्मचाऱ्यांच्या तक्रारी निवारण करण्यास्तव महिला तक्रार निवारण समिती गठीत करण्यात आली होती. सदर समितीमधील अध्यक्ष व सदस्य यांचा ३ वर्षाचा कार्यकाल संपुष्टात आला असल्याने पुन्हा नव्याने समिती गठित करण्याची बाब विचाराधीन आहे.

शासन निर्णय:

शासकीय सेवेतील महिला कर्मचाऱ्यांच्या कामाच्या ठिकाणी होणाऱ्या लैंगिक छळवणूकीस प्रतिबंध करण्यासाठी सर्वोच्च न्यायालयाने दिलेल्या सूचनांनुसार महिलांकडून आलेल्या तक्रारींचे

निवारण करण्यासाठी उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग (खुद्द) साठी खालीलप्रमाणे समिती गठित करण्यात येत आहे.

| अ.क्र. | नाव व पदनाम | समितीत धारण केलेले पद |
|---|---|---|
| १. | श्रीमती सुनिता हजारी, अवर सचिव | अध्यक्ष |
| २. | श्रीमती शिल्पा गि. चौधरी, कक्ष अधिकारी | सदस्य |
| ३. | डॉ. गौरी रा. पाटील, कक्ष अधिकारी | सदस्य |
| ४. | कक्ष अधिकारी (आस्थापना) | सदस्य सचिव |
| ५. | श्री. शशांक तु. चव्हाण, कक्ष अधिकारी | सदस्य |
| ६. | ॲड. प्रियांका संगारे, ठाणे. | अशासकीय सदस्य |

२. या विभागात काम करणाऱ्या महिला कर्मचाऱ्यांना त्यांच्या तक्रारी, समितीच्या अध्यक्षांकडे किंवा सदस्य सचिवांकडे सादर करता येतील. समितीचे अध्यक्ष व प्रत्येक सदस्य, नियुक्तीच्या दिनांकापासून ३ वर्षाहून अधिक नसेल इतक्या कालावधीसाठी सदर पद धारण करतील.

३. समितीच्या कामकाजासंदर्भातील तरतूदी पुढील प्रमाणे आहेत -

१. कामाच्या ठिकाणी महिलांचे लैंगिक छळापासून संरक्षण (प्रतिबंध, मनाई आणि निवारण) अधिनियम २०१३ च्या कलम २४ अनुसार सदर कायद्याबद्दल जनजागृती करण्याकरिता व्हीडीओ-कॉन्फरन्समार्फत ६ महिन्यातुन एकदा बैठक आयोजित करावी.

२. विभागातील महिला अधिकारी/कर्मचारी यांच्याकडून लैंगिक छळाच्या प्राप्त तक्रारीच्या अनुषंगाने अधिनियमामध्ये घालून दिलेल्या तरतूदीनुसार तक्रारीची चौकशी करणे.

३. तक्रारीत तथ्य आढळल्यास त्याबाबत चौकशी करुन संबंधितांविरुध्द कारवाई करण्याकरीता प्रधान सचिव (प्रशासन) यांना अहवाल सादर करावा.

४. समितीने त्यांचा वार्षिक अहवाल तयार करुन महिला व बाल विकास विभाग, मंत्रालय, मुंबई यांना सादर करावा. सदर वार्षिक अहवालात या अधिनियमांतर्गत प्राप्त झालेल्या प्रकरणांची संख्या, निकालात काढलेल्या प्रकरणांची संख्या याबाबतचा अंतर्भात असावा.

४. अशासकीय सदस्यांना मानधन व भत्ते महिला व विकास विभागाच्या दिनांक १९.६.२०१४ रोजीच्या शासन निर्णयातील तरतूदीनुसार देय होईल. त्यांच्या मानधन तसेच प्रवासाचा खर्च, -मागणी क्रमांक- के ८, मुख्य लेखाशिर्ष क्रमांक -३४५१ सेक्रेटरीएट आर्थिक सेवा (०९०) सेक्रेटरीएट (००)(०१)

उदयोग, ऊर्जा व कामगार विभाग, (३४५१००७३)-१३ कार्यालयीन खर्च, या लेखाशिर्षातून भागविण्यात यावा.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharastra.gov.in संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्यांचा संकेतांक २०२३०७०४१५१३५१२३१० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

DR. SHRIKANT LAXMANRAO PULKUNDWAR

Digitally signed by DR. SHRIKANT LAXMANRAO PULKUNDWAR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=INDUSTRIES ENERGY AND LABOUR DEPARTMENT, 2.5.4.20=feb24b5f5d1512bb47f7bae5ad1db4953358cd43c999bdf0814c6bb78364d50a, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=C10A1E6C8FBE08C1180978BD3ED8A151ED05202D522B09B9960341C2F080906D, cn=DR. SHRIKANT LAXMANRAO PULKUNDWAR
Date: 2023.07.04 15:15:24 +05'30'

**(डॉ. श्री. ल. पुलकुंडवार)**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत-**

१. प्रधान सचिव (उदयोग) यांचे स्वीय सहायक, उदयोग, ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई
२. प्रधान सचिव (कामगार व प्रशासन) यांचे स्वीय सहायक, उदयोग, ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई
३. प्रधान सचिव (ऊर्जा) यांचे स्वीय सहायक, उदयोग, ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई
४. प्रधान सचिव , महिला व बाल कल्याण विभाग, मंत्रालय, मुंबई
५. अध्यक्ष, राज्य महिला तक्रार निवारण समिती, नवीन प्रशासन भवन, मंत्रालय, मुंबई.
६. अध्यक्ष, महिला तक्रार निवारण समिती, उदयोग, ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई
७. संबंधित सदस्य, उदयोग, ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई
८. ॲड प्रियांका संगारे, १०३, नवरंग आर्केड, गोखले रोड, नौपाडा, ठाणे, (प.) ४००६०२.
९. सर्व सह सचिव /उप सचिव, उदयोग, ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई
१०.अवर सचिव/ कक्ष अधिकारी, उदयोग, ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई

कक्ष अधिकारी यांना कळविण्यात येते की, सदर आदेश कार्यासनातील सर्व कर्मचाऱ्यांच्या निदर्शनास आणावा.

११. कक्ष अधिकारी, प्रशा-४, उदयोग, ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई
१२.निवड नस्ती.